**सार्वजनिक उपक्रमातील कर्मचाऱ्यांना, राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांप्रमाणे महागाई भत्त्यातील मूळ वेतनाच्या ५०% एवढा महागाई भत्ता मूळ वेतनामध्ये विलीन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

वित्त विभाग

शासन निर्णय क्रमांक :शासाउ-१०.०५/प्र.क्र.३/सा.उ.

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २६ जुलै, २००५

वाचा:- १) शासन निर्णय क्रमांक : मभवा-११०४/प्र.क्र. ५/सेवा-९, दिनांक १९ जुलै,२००४.

२) शासन परिपत्रक क्रमांक- शासाउ-१०.०४/प्र.क्र.६/सा.उ., दिनांक १९ ऑक्टोंबर, २००४.

**प्रस्तावना** :-

राज्य शासनाने, राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना महागाई भत्त्यातील मूळ वेतनाच्या ५० टक्के एवढा महागाई भत्ता, दिनांक १/८/२००४ पासून मूळ वेतनामध्ये विलीन करण्याबाबतचा निर्णय, संदर्भ (१) शासन निर्णय, दिनांक १९ जुलै, २००४ अन्वये घेतला आहे. सदर शासन निर्णयान्वये निर्गमित केलेले आदेश सार्वजनिक उपक्रमांच्या कर्मचाऱ्यांना लागू आहेत किंवा कसे, याबाबत संदर्भ क्रमांक (२) अन्वये दिनांक १९ ऑक्टोंबर, २००४ च्या शासन परिपत्रकान्वये सुचना निर्गमित केल्या आहेत.त्यानुसार संदर्भ (१) अन्वये निर्गमित केलेले आदेश सार्वजनिक उपक्रमांमधील कर्मचाऱ्यांना लागू करण्यात आलेले नाहीत, ही बाब स्पष्ट करण्यात आलेली होती व त्या अनुषंगाने यासंदर्भातील कोणतीही कार्यवाही या विभागाच्या पूर्वपरवनागीशिवाय करण्यात येऊ नये, अशा सुचना सार्वजनिक उपक्रमांना देण्यात आल्या होत्या.

**शासन निर्णय** :-

शासन, आता यासंदर्भात असे आदेश देत आहे की, ज्या उपक्रमांना दिनांक १६/२/२००० च्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णयानुसार पाचव्या वेतन आयोगाच्या वेतन सुधारणेच्या शिफारशी लागू करण्यात आल्या आहेत, अशा या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्रातील, सार्वजनिक उपक्रमातील कर्मचाऱ्यांना, दिनांक १९/७/२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार व या शासन निर्णयातील विहीत अटी व शर्तीच्या अधीन राहून महागाई भत्त्यातील मूळ वेतनाच्या ५० टक्के एवढा महागाई भत्ता, त्यांच्या मूळ वेतनात विलीन करण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अ.मा.काळे)

कक्ष अधिकारी, वित्त विभाग

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
६. मंत्रालयीन विभाग.
७. राज्य शासनाचे सार्वजनिक उपक्रम
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
१०.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
११. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबइ
१२. वित्त विभागातील सर्व कार्यासने
१३. निवड नस्ती (सा.उ.)

**शासन निर्णय क्रमांक :- शासाउ-१०.०५/प्र.क्र.३/०५/सा.उ., दिनांक  च्या सोबतचे प्रपत्र**

**महागाई भत्त्यातील मूळ वेतनाच्या ५०% एवढा महागाई भत्ता मूळ वेतनामध्ये विलीन करण्यास पात्र उपक्रम**

| अ.क्र. | उपक्रमाचे नांव |
|---|---|
| १ | महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ |
| २ | महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ |
| ३ | महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण |
| ४ | महाराष्ट्र शहर व औद्योगिक विकास महामंडळ |
| ५ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण |
| ६ | महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमि आणि सांस्कृतिक विकास महामंडळ |
| ७ | महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ |
| ८ | हाफकिन जीव-औषध निर्माण महामंडळ |
| ९ | महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ |

.